**उपसंचालक आरोग्य सेवा, मंडळ, पुणे यांचे अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, कोरेगाव,जि. सातारा येथील ०९ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**

शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२२/प्र.क्र.९१/आरोग्य-४
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१,
दिनांक : २९ एप्रिल २०२२.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. पदनि-२०२०/ प्र.क्र. ४४/ आ-३, दि. ०७.०६.२०२१

२) शासन निर्णय ,वित्त विभाग, क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१.

३) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष ३/टे-१२/उजिरु कोरेगाव,जि.सातारा/अपदे/सन २१-२२/१६९८-१७००/२१, दि. १६.०२.२०२२

**शासन निर्णय :-**

उपसंचालक आरोग्य सेवा,पुणे मंडळ यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, कोरेगाव जि. सातारा येथील ०९ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव आरोग्य सेवा आयुक्तालयाने उपरोक्त अ.क्र. ३ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे . सदर पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या **"परिशिष्ट-अ"** मध्ये नमूद करण्यात आलेल्या उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, कोरेगाव जि. सातारा या आरोग्य संस्थांमधील ०९ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन खालील लेखाशीर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावा आणि हा खर्च सन २०२२-२०२३ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| लेखाशिर्ष |
|---|
| मागणी क्रमांक आर-१ मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन,(०१) (०९) महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पांतर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयाचे उप जिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन (२२१०४६२४)" |

४.  सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र२०१-पदनि.६.क्र.प्र/८/१६/आपुक -दिनांक, १५.०२.२०२१ व दि १०.०८.२०२१ .च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१३३७१४४८१७

असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SACHIN SHAMKANT DESAI

Digitally signed by SACHIN SHAMKANT DESAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=52275339d48b6fd35ef523ecd953ba59cbb2b2b4d4413dff8b3f2fb17710505f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6FF04EBFFAB4F962AD757B0E36E3A96AB5DB4421F6C9568763153DEA139498B2, cn=SACHIN SHAMKANT DESAI
Date: 2022.05.02 10:56:01 +05'30'

**( सचिन देसाई )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. अपर मुख्य सचिव,सार्वजनिक विभाग,मंत्रालय,मुंबई.
२. मा. प्रधान सचिव,सार्वजनिक विभाग,मंत्रालय,मुंबई
३. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई /नागपूर.
४. आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
६. सहसंचालक,आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे, पुणे.
९. जिल्हा शल्य चिकित्सक , सातारा
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
११.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.अवर सचिव / कार्यासन अधिकारी, (सेवा-१/सेवा-२/सेवा-३/सेवा-५/आरोग्य ३, आरोग्य ३-अ,अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य- ४)

---

**"परिशिष्ट - अ"**

सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र.अपदे-२०२२/प्र.क्र.९१/आरोग्य-४

(दिनांक २९ एप्रिल,२०२२ सोबतचे विवरणपत्र)

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकुण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| ग्रामीण रुग्णालय कोरेगाव, जि.सातारा | | ०९ | ०० | ०९ |
| १ | वैद्यकीय अधिकारी,गट-१ (०१पद) | | | |
| २ | वैद्यकीय अधिकारी,गट-१ (०१पद) | | | |
| ३ | वैद्यकीय अधिकारी,गट-१ (०१पद) | | | |
| ४ | वैद्यकीय अधिकारी,गट-१ (०१पद) | | | |
| ५ | वैद्यकीय अधिकारी,गट-१ (०१पद) | | | |
| ६ | सहायक अधिसेविका,गट -३ (०१ पदे) | | | |
| ७ | परिसेविका (०२ पदे) | | | |
| ८ | वरिष्ठ लिपीक,गट -३ (०१ पद) | | | |
| | **एकूण पदे -०९ पदे** | | | |